**महाराष्ट्र लोकसेवा आयोगामार्फत आयोजित परीक्षांकरिता शाळा/महाविद्यालये उपलब्ध करुन देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**

**शासन परिपत्रक क्रमांक : संकीर्ण-१११११/(प्र.क्र.९/१५)/समन्वय**

मंत्रालय विस्तार भवन, मादाम कामा मार्ग, मुंबई - ४०० ०३२.

तारीख: २८ जानेवारी, २०१५.

वाचा :-

१. शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग क्र.मलोआ-१०१२/ प्र.क्र.९५/१२/आठ, दि.११.५.२०१२.

२. महाराष्ट्र लोकसेवा आयोगाचे पत्र (१) क्र.८६(१)/२०१२/तीन, दि.९.७.२०१४ व (२) क्र.८६(१)/२०१५/तीन, दि.३.१२.२०१४.

**शासन परिपत्रक :-**

महाराष्ट्र शासनाच्या संबंधीत विभागाच्या मागणीच्या आधारे शासन सेवेतील विविध पदांवरील भरतीकरिता महाराष्ट्र लोकसेवा आयोगामार्फत वेळोवेळी परिक्षांचे आयोजन केले जाते. यासाठी जिल्हाधिकाऱ्यांकडून शाळा/ महाविद्यालये उपलब्ध करुन देण्याबाबत मागणी केली जाते व बहुतांशी शाळा/ महाविद्यालयांकडून नकार दिला जातो. परिणामी शाळा/ महाविद्यालयाच्या असहकाराचा विपरित परिणाम आयोगाच्या परीक्षा आयोजनावर होत असतो. ही बाब विचारात घेऊन आयोगाच्या परीक्षांकरिता मागणीनुसार शाळा/ महाविद्यालये उपलब्ध करुन द्यावीत अन्यथा त्यांच्याविरुध्द कार्यवाही करण्यात येईल असे निदेश/सूचना संबंधितांना संचालक, शिक्षण/तंत्र शिक्षण/उच्च शिक्षण/व्यवसाय प्रशिक्षण यांच्यामार्फत कृपया द्याव्यात, अशा सूचना संदर्भाधिन शासन परिपत्रकान्वये देण्यात आल्या आहेत.

२. महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या परीक्षांकरिता मागणीनुसार शाळा/ महाविद्यालये उपलब्ध करुन द्यावीत अन्यथा त्यांच्याविरुध्द कार्यवाही करण्यात येईल असे निदेश /सूचना संचालक, तंत्र शिक्षण /उच्च शिक्षण /व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण यांनी सर्व संबंधितांना द्यावेत. तसेच संचालक, तंत्र शिक्षण /उच्च शिक्षण/ व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण यांनी महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या परीक्षांकरिता मागणीनुसार शाळा/ महाविद्यालये उपलब्ध करुन न देणा-या संस्थांविरुध्द कार्यवाही करण्यात यावी.

३. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०१२८१७२३१४६२०८ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Kamini R Pilankar

Digitally signed by Kamini R Pilankar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Desk Officer, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=791d70f75a8bfaa8349786f02d71cad4fb9d1999ea0d92d63dcf5de198d4f817, cn=Kamini R Pilankar
Date: 2015.01.28 17:32:29 +05'30'

**( का.रा.पिळणकर )**

कार्यासन अधिकारी

**प्रत,**

१. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, ८ वा मजला, कुपरेज टेलिफोन निगम इमारत, महर्षि कर्वे मार्ग, कुपरेज, मुंबई- ४०० ०२१.
२. संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
३. संचालक, तंत्र शिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई .
४. संचालक, व्यवसाय शिक्षण, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
५. संचालक, प्रशिक्षण , व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
६. सामान्य प्रशासन विभाग ( का-८ ), मंत्रालय, मुंबई.
७. सर्व सह सचिव /उप सचिव /अवर सचिव /कक्ष अधिकारी, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई
८. निवडनस्ती (समन्वय).